वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत मौजे कोटनांद्रा व डोईफोडा, ता.सिल्लोड, जि.औरंगाबाद येथील शासकीय जागेवर मका संशोधन केंद्र स्थापन करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : मकृवि १२२२/प्र.क्र.२०९/७-अे,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २८/०६/२०२३.

वाचा:- १) मा.मंत्री (कृषि) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या दि.१६.०८.२०२२ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

२) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांचे जा.क्र.मकृप/संशोधन/२३१६/ २०२२, दि.१८.१०.२०२२ रोजीचे पत्र.

३) मा.मंत्रिमंडळाच्या दि.३०.०५.२०२३ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त दि.१३.०६.२३

**प्रस्तावना:-**

मका हे बहुआयामी तृणधान्य पीक आहे. मका हे जागतीक स्तरावर तांदुळ आणि गव्हानंतरचे महत्वाचे पीक आहे. इतर तृणधान्य पिकांपेक्षा मक्याचे उत्पादन अधिक असल्यामुळे मका हे महत्त्वाचे पिक आहे. मका हे विविध प्रकारच्या हवामानात व भौगोलिक क्षेत्रात येणारे तसेच तिन्ही हंगामात येणारे पिक आहे. सर्व विकसित व विकसनशील देशात मका पिकाची अन्नधान्यासाठी मागणी तसेच औद्योगिक वापरासाठी विकसित देशामध्ये मोठया प्रमाणावर मका पिकाची मागणी आहे. कोंबडी खाद्य, पशुखाद्य आणि औद्योगिक क्षेत्रात मोठया प्रमाणावर मका पिकाची मागणी वाढत आहे. त्यामुळे मका पिकाखालील क्षेत्रामध्ये महाराष्ट्र राज्यात लक्षणीयरित्या वाढ दिसून येत आहे.

मका हे महाराष्ट्र राज्याचे महत्त्वाचे पिक असून या पिकाखाली सुमारे ११.४८ लाख हेक्टर क्षेत्र आहे. पिकाची सरासरी उत्पादकता २६५९ किग्रॅ प्रति हेक्टरी आहे व उत्पादन ३०५.४० लाख टन आहे. त्याचप्रमाणे मराठवाडयात या पिकाखाली सुमारे २.९९ लाख हेक्टर क्षेत्र असून पिकाची उत्पादकता १९९६ किलो प्रति हेक्टरी असून उत्पादन ५९.८५ लाख टन आहे. महाराष्ट्रात रब्बी हंगामापेक्षा खरीप हंगामात मका पीक मोठया प्रमाणावर घेतले जाते. त्याचप्रमाणे रब्बी व उन्हाळी हंगामात देखील मका पिकाचे क्षेत्र वाढत आहे. महाराष्ट्र राज्यात मका पिकाखालील सर्वात जास्त क्षेत्र औरंगाबाद जिल्हयात (२.०३ लाख हे.) असून त्या खालोखाल नाशिक (१.०१६ लाख हे.) जळगाव (०.६९ लाख हे.) बुलढाणा (०.५४९ लाख हे.) व जालना (०.५६८ लाख हे.) या जिल्हयात असून त्याची उत्पादकता इतर जिल्हयापेक्षा जास्त आहे. तसेच बुलढाणा यवतमाळ व अकोला या जिल्हयातसुध्दा मका पिकाखालील क्षेत्रामध्ये झपाटयाने वाढ होत आहे. महाराष्ट्रातील मका पिकाखालील एकूण क्षेत्रापैकी (३६ टक्के) क्षेत्र व उत्पादनापैकी (३२ टक्के) उत्पादन हे मराठवाडयात होते. यापैकी बहुतांश क्षेत्र हे कोरडवाहू आहे, त्यामुळे मराठवाडयात मका पिकाच्या वाढीसाठी भरपूर वाव आहे.

मका पिकाची महाराष्ट्र व मराठवाडयाची उत्पादकता ही राष्ट्रीय उत्पादकतेच्या बरोबरीने आहे. मका पिकाच्या कमी उत्पादकतेचे महत्वाचे कारण बदलते हवामान, आंतरपीक पध्दतीचा अभाव,

कमी प्रमाणात खताचा वापर, सिंचनाच्या कमी सोयी, हलक्या जमिनीत पीक घेणे तसेच अवर्षण काळात पाण्याचा ताण पडल्यास पाणी न देणे इत्यादी कारणामुळे मका पिकाचे उत्पादन कमी येते. मका हे पिक सर्व प्रकारच्या हवामानात (शीत, समशीतोष्ण, उष्ण) व सर्व प्रकारच्या भौगोलिक वातावरणात येते.

मराठवाडा विभागातील औरंगाबाद तसेच जालना या भागात मका पीक मागील काही वर्षापासून शेतकरी मोठया प्रमाणात पेरत आहेत. मराठवाडयातील हवामान, भौगोलीक स्थिती तसेच जमीन लक्षात घेता इतर विभागातील संशोधन या भागात उपयोगी पडणार नाही. या भागातील हवामान बदलानुरूप परिस्थिती तसेच शेतकऱ्यांची मातीची तांत्रिक निकड लक्षात घेता स्वतंत्रपणे संशोधन होणे गरजेचे आहे.

मका पिकाचे सुधारीत लागवड तंत्रज्ञान, किड व रोग संरक्षण, तण व्यवस्थापन, आंतरपीक पध्दती, अन्नद्रव्य आणि पाणी व्यवस्थापन, मुल्यवर्धन इत्यादी विविध विषयावरील सखोल संशोधन होणे गरजेचे आहे. बदलत्या हवामानामुळे रोगांचा प्रादुर्भाव वाढत असल्यामुळे उत्पादनात घट होत आहे. त्यामुळे औरंगाबाद विभागात संशोधन केंद्र झाल्यास किड व रोग प्रतिकारक वाण शोधणे, किडीचे व्यवस्थापन तंत्रज्ञान, बदलत्या हवामानाचा मका पिकावरील किड रोगांवर परिणाम अभ्यासणे इ. संशोधन प्रयोग घेऊन शेतकऱ्यांना योग्य मार्गदर्शन करणे शक्य होणार आहे.

सद्यस्थितीत राज्यात भारतीय कृषि अनुसंधान परिषदेच्या अर्थसहाय्यातून केंद्र शासन पुरस्कृत अखिल भारतीय समन्वीत मका सुधार प्रकल्प कोल्हापूर येथे राबवण्यात येत असून सदर संशोधन केंद्र हे महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांच्या कार्यक्षेत्रात येथे सदर प्रकल्पासाठी ७५:२५ अनुदान असून केंद्र शासनाकडून योजनेकरीता ७५% अनुदान प्राप्त होत आहे. सदरील संशोधन केंद्रामार्फत पश्चिम महाराष्ट्रासाठी कार्य केले जात आहे. मराठवाडा विभागातील औरंगाबाद, जालना व बुलढाणा या भागात मका पिक मागील काही वर्षांपासून शेतकरी मोठ्या प्रमाणावर घेत आहेत. राज्यातील पर्जन्यमान, हवामान, भौगोलिक रचना व शेती विषयक विविध गरजा लक्षात घेता मराठवाडा विभागात मका संशोधन केंद्र स्थापन करणे आवश्यक असल्याने वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत मौजे कोटनांद्रा व डोईफोडा ता.सिल्लोड, जि.औरंगाबाद येथील शासकीय जागेवर मका संशोधन केंद्र स्थापन करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत मौजे कोटनांद्रा व डोईफोडा ता.सिल्लोड, जि.औरंगाबाद येथील शासकीय जागेवर मका संशोधन केंद्र स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर मका संशोधन केंद्राची उद्दिष्टे खालीलप्रमाणे आहेत.

१. मका पिकाचे विविध अनुवांशिक सामुग्री (जर्मप्लाझम) गोळा करणे व अधिक उत्पादन देणारे संकरीत वाणांची निर्मिती करणे.
२. जैवसंपृक्त वाणांची निर्मिती करणे.

३. किड व रोगास प्रतिकारक वाणांची निर्मिती करणे.
४. सुधारीत लागवड तंत्रज्ञान विकसीत करणे.
५. एकात्मिक कीड व रोग व्यवस्थापन तंत्रज्ञान विकसीत करणे.
६. सुधारित तंत्रज्ञान शोधुन प्रात्यक्षिकाव्दारे शेतक-यांना माहिती देणे.
७. मका पिकाची बहुउपयोगिता (औद्योगिक उपयोग) शेतकऱ्यांस माहिती देणे.

३. मका संशोधन केंद्रासाठी आवश्यक खर्चास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

**अनावर्ती खर्च:-**

यंत्र आणि उपकरणे (रू.लाखात)

| अ. क्र | बाब | नग/ संख्या | प्रथम वर्षे | दुसरे वर्षे | तिसरे वर्षे | चौथे वर्षे | पाचवे वर्षे | एकुण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | कार्यालय (फर्निचर सह), | १ | ३५०.०० | - | - | - | - | ३५०.०० |
| २ | संगणक व इतर साहीत्य | ६ | १०.०० | - | - | - | - | १०.०० |
| ३ | भांडारगृह, मळणी यार्ड | - | ७५.०० | - | - | - | - | ७५.०० |
| ४ | गोदाम व प्रक्रिया युनिट | - | १००.०० | - | - | - | - | १००.०० |
| ५ | ट्रॅक्टर व अवजारे इ. | २ | ५०.०० | - | - | - | - | ५०.०० |
| ६ | आधुनिक सिंचन व्यवस्था | १ | २५.०० | १०.०० | - | - | - | ३५.०० |
| ७ | बैलगाडी | १ | ०१.५० | - | - | - | - | १.५० |
| ८ | शेती अवजारे (बैलचलीत) | - | ०५.०० | ०५.०० | - | - | - | १०.०० |
| ९ | प्रयोगशाळा साहित्य | - | ५०.०० | ५०.०० | - | - | - | १००.०० |
| १० | कुंपन/ संरक्षण भिंत | - | १२५.०० | - | - | - | - | १२५.०० |
| ११ | निवासस्थाने (अ,ब,क, टाईप) | - | ३००.०० | - | - | - | - | ३००.०० |
| १२ | विश्रामगृह | १ | ५०.०० | - | - | - | - | ५०.०० |
| **एकुण** | | - | **११४१.५** | **६५.००** | | - | - | १२०६.५० **(१२०७.००)** |

**आवर्ती खर्च** :- (रू.लाखात)

| अ. क्र. | बाब | प्रथम वर्षे | दुसरे वर्षे | तिसरे वर्षे | चौथे वर्षे | पाचवे वर्षे | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | वेतन व भत्ते | १४०.८७ | १५५.९५ | १७१.५८ | १८८.६७५ | २०७.५५५ | ८६५.४३ |
| २ | प्रवास | ०२.०० | ०२.०० | ०३.०० | ०३.०० | ०३.०० | १३.०० |
| ३ | शेती उपयोगी किरकोळ साहित्य,खते,बी,बियाणे औषधे, कंत्राटी कामे | २०.०० | २३.०० | २६.०० | ३०.०० | ३४.०० | १३३.०० |
| **एकूण** | | १६२.८७ | १८०.९५ | २००.५८ | २२१.६७५ | २४४.५५ | १०११.४३ (१०११.००) |
| **एकूण आवर्ती + अनावर्ती खर्च** | | | | | | | **२२१८.००** |

४. मका संशोधन केंद्रासाठी आवश्यक २१ पदे तसेच बाह्यस्त्रोताद्वारे १८ पदे मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीच्या मान्यतेच्या अधिन राहून निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५. या प्रित्यर्थचा खर्च मागणी क्र. डी-३, २४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१,पीकसंवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य,(००) (०९) वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम)(२४१५०१०५) या लेखाशिर्षातंर्गत ३१,सहायक अनुदान (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली त्या-त्या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१६३/२०२३/व्यय-१, दि.२३.०६.२३ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने तसेच मा.मंत्रिमंडळाने दि.३०.०५.२०२३ रोजीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्र. २०२३०६२८१६४१३१६२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2023.06.28 16:43:36 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (नियोजन व वित्त) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (महसूल व वने) यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग,मंत्रालय, मुंबई.
८. महासंचालक तथा सदस्य सचिव,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
९. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक/विद्यापीठ अभियंता,वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
१०. जिल्हाधिकारी, परभणी.
११. उपविभागीय कृषि अधिकारी, परभणी.

१२. महालेखापाल, महाराष्ट्र १ /२ (लेखापरीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी /उप कोषागार अधिकारी, परभणी.
१४. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१५. उप लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१८. वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१९. नियोजन विभाग (कार्यासन -१४३१), मंत्रालय, मुंबई.
२०. निवडनस्ती (कार्यासन-७ अे).